**सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) या योजनेअंतर्गत मंजूर अर्थसंकल्पीय तरतूद आहरित करून संवितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. रूसायो-२०१७/२९/विशि-३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ जून, २०१७

<u>वाचा:</u> (१) शासन निर्णय क्रमांक: रूसायो २०१३/प्र.क्र.४१८/विशि-३ दि.२०.०५.२०१५
(२) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र:अर्थस-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दि.१८.०४.२०१७
(३) राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान,मुंबई यांचे पत्र क्रं प्र.स. /रूसा /९२४ दिं. २८/०६/२०१७

**प्रस्तावना:-**

राज्यामध्ये प्राथमिक शिक्षणाचे सबलीकरण करण्यासाठी राबविण्यात आलेल्या सर्व शिक्षा अभियान व राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानाच्या यशस्वीतेमुळे उच्च शिक्षणाची गुणवत्ता व पाया यांचे सबलीकरण करण्यासाठी एकछत्री योजना अभियान स्वरूपात राबविण्याकरीता केंद्र शासनाने राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) ही योजना १२ व्या व १३ व्या पंचवार्षिक योजनेमध्ये राबविण्याचे ठरविले आहे. महाराष्ट्र राज्यात उच्च शिक्षणात गुणवत्ता, सर्वदूर संधी, समानता यासाठी केंद्र शासनाने तयार केलेल्या राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानाच्या अंमलबजावणीबाबत दि. २१.०४.२०१५ रोजी मंत्रीमंडळाच्या बैठकीत निर्णय घेण्यात आलेला आहे. राज्य मंत्री मंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने ही योजना राज्यात प्रभावीपणे राबविण्यासाठी राज्य प्रकल्प संचालनालयाची स्थापना करण्यात आलेली आहे. या योजनेअंतर्गत अकृषी विद्यापीठे व शासकीय संस्था याना अनुदान वितरीत करण्याचे केंद्र व राज्याचे प्रमाण ६०:४० असे ठरविण्यात आलेले आहे.

राज्य प्रकल्प संचालनालयासाठी राज्य शासनाने सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेली अर्थसंकल्पिय तरतूद आहरीत करुन संवितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) या योजनेअंतर्गत राज्य प्रकल्प संचालनालयासाठी राज्य शासनाने, सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता (२२०२आय२७२) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली मंजूर केलेली खालील तक्त्यात दर्शविलेली उदिष्टनिहाय तरतूद राज्य प्रकल्प

संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान यांना आहरीत करुन संवितरीत करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उद्दीष्टे (Objects) | वित्तीय वर्ष २०१७-१८ साठी मंजूर अनुदान |
|---|---|---|
| १ | ०३ अतिकालीक भत्ता | रु .१,०००/- |
| २ | ०६ दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | रु. १,१५,०००/- |
| ३ | ११ देशांतर्गत प्रवास खर्च | रु. ७,३०,०००/- |
| ४ | १३ कार्यालयीन खर्च | रु. ३४,७८,०००/- |
| ५ | १४ भाडे, पट्टी व कर | रु. ४०,७५,०००/- |
| ६ | १६ प्रकाशने | रु .१,०००/- |
| ७ | १७ संगणक खर्च | रु. १,०८,०००/- |
| ८ | २० इतर प्रशासकिय खर्च | रु. १८,६८,०००/- |
| ९ | २१ पुरवठा व सामग्री | रु .१,०००/- |
| १० | २४ पेट्रोल तेल व वंगणे | रु .१,०००/- |
| ११ | २६ जाहिरात व प्रसिध्दी | रु .१,०००/- |
| १२ | २८ व्यावसायिक सेवा | रु. १,५०,०००/- |
| १३ | ३४ शिष्यवृत्त्या/विद्यावेतन | रु. १,५०,०००/- |
| १४ | ३६ सहायक अनुदाने (वेतन) | रु. ५३,३५,०००/- |
| १५ | ५० इतर खर्च | रु. ५,९४,०००/- |
| १६ | ५१ मोटर वाहने | रु. १२,००,०००/- |
| १७ | ५२ यंत्रसामग्री व साधन सामग्री | रु .१,०००/- |
| | **एकूण** | **रु. १,७८,०९,०००/-** |

२. सद्यस्थितीत राज्य प्रकल्प संचालनालयासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून राज्य प्रकल्प संचालक, रुसा व राज्य प्रकल्प सहसंचालक यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

३. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता राज्य प्रकल्प संचालनालयाने सादर केली पाहीजेत. राज्य प्रकल्प संचालनालयास राज्य शासनाने ज्या प्रयोजनार्थ निधी मंजूर केलेला आहे त्या निधीचा वापर त्या प्रयोजनासाठी करावा. तसेच खरेदी करताना वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील तरतूदी तसेच संदर्भ क्र.२ मधील परिशिष्ट ९ मध्ये अंतर्भूत केलेल्या व

शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील अटिंचे ततोतंत पालन करावे व खरेदी प्रक्रियेच्या प्रचलित शासनाच्या नियम व अटी, शर्ती विचारात घेऊन खरेदी करण्यात यावी. विहित कालावधीमध्ये सदरचा खर्च पुर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

४. सदर खर्च मागणी क्र.डब्ल्यू-२, प्रधानशीर्ष-२२०२-सर्वसाधारण शिक्षण ०३ विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०२ विद्यापीठांना सहाय्य (०७) (०१) व (०२) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान अंतर्गत शासकिय संस्थांना सहायक अनुदान (४०% राज्य हिस्सा)(२२०२ आय २७२) ३१ सहायक अनुदाने या लेखाशीर्षखाली सन २०१७-१८ मध्ये मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प.क्र.७५/अर्थ-३,दि. १८ एप्रिल, २०१७ च्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर दि. १८ एप्रिल, २०१७ च्या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटीची तसेच परिपत्रकातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०७०११६५०५८७६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2017.07.05 16:00:02 +05'30'

**( सिध्दार्थ खरात )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा विद्यापीठाचे कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान.
३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
४. सर्व अकृषि विद्यापीठांचे कुलगुरू,
५. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
६. महालेखापाल-१ (लेखा विभाग), महाराष्ट्र-१, मुंबई.
७. महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर
८. महालेखापाल-२(लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
९. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई.
१०.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
११.जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/ पुणे.

१२.नियोजन विभाग(कार्यासन १४७१) मंत्रालय, मुंबई.
१३.वित्त विभाग, (कार्यासन व्यय-५/कार्यासन अर्थोपाय)मंत्रालय,मुंबई
१४.मा.मंत्री(उ.व.तं.शि), यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई.
१५.मा.राज्यमंत्री(उ.व.तं.शि), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६.मा.प्रधान सचिव(उ.व.तं.शि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१७.उप सचिव(विशि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८. कार्यासन अधिकारी (साशि-१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९.निवडनस्ती.